॥ श्रीश्रीगुरु–गौराङ्गौ जयतः ॥

# महर्षी दुर्वासा
# आणि
# श्रीदुर्वासा–आश्रम

श्रीगौडीय वेदांत समिती आणि तिच्या अंतर्गत भारतव्यापी
श्रीगौडीय मठांचें प्रतिष्ठाता, श्रीकृष्णचैतन्याम्नाय दशमाधस्तनवर
श्रीगौडीयाचार्य केसरी नित्यलीला प्रविष्ट ॐ विष्णुपाद
अष्टोत्तरशतश्री
**श्रीश्रीमद्भक्तिप्रज्ञान केशव गोस्वामीचरणांचे**
अनुगृहीत

**नित्यलीला–प्रविष्ट ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत**
**श्रीश्रीमद्भक्तिवेदांत नारायण गोस्वामी महाराजांद्वारे**
रचित

**प्रकाशकः** श्रीमान भक्तिवेदांत दंडी महाराज
श्री रंगनाथ गौडीय मठ, नृत्य–ग्रामाजवळ,
हेसरघट्टा, बंगलोर–५६००८८
मोबाईलः ९३७९४४७८९५, ९०२१६२५२२८

**इ–पत्रः** bvdandi@gmail.com
ekadasifoundation@gmail.com

**वेब–साईटः** http://www.purebhakti.com

# महर्षी दुर्वासा आणि श्रीदुर्वासा–आश्रम

व्रजमंडळांतर्गत प्रमुख बारा वने आहेत. ह्या बारा वनांमध्ये प्रत्येकाच्या अंतर्गत अनेक उपवने आणि त्या उपवनांच्या अंतर्गत अनेक शाखा वने आहेत. या द्वादश वनांमध्ये यमुनेच्या पूर्वेकडे भद्रवन, भाण्डीरवन, बिल्ववन, महावन आणि लोहवन आहेत. पश्चिमेकडे मधुवन, तालवन, कुमुदवन, बहुलावन, काम्यवन, खदीरवन आणि वृंदावन आहेत. यापैकी लोहवनांततर्गत यमुनेच्या किनाऱ्यावर मथुरेपासून ठीक दोन फर्लांग अंतरावर यमुनेच्या पलीकडे दुर्वासा मुनींचा अत्यंत प्राचीन आश्रम आहे.

महर्षी दुर्वासा सत्य, त्रेता आणि द्वापर—तीनही युगात प्रसिद्ध असे एक सिद्ध योगी आणि महर्षी आहेत. यांच्या मृत्यूचा कुठेही उल्लेख नाही. आजपण ते गुप्त वेषात कुठेनाकुठे नक्कीच उपस्थित असतील. ते खूप विचित्र (अवघड स्वभावाचे) ऋषी आहेत. ते कधी काय करू इच्छितात, हे समजणे खूपच कठीण आहे. त्यामुळे हे सर्व काळ दुर्बोध (कळण्यास अगम्य) आहेत. ते महादेव शंकराच्या अंशाने आविर्भूत झाले आहेत. कधीकधी त्यांच्यामधे विनाकारणच खूप राग पण दिसून येतो. ते सर्व प्रकारचे लौकिक वरदान देण्यास समर्थ आहेत.

## सत्य युगामध्ये महर्षी दुर्वासा

त्यांचा हा आश्रम अर्थात दुर्वासा ऋषी आश्रम पण अत्यंत प्राचीन स्थळ आहे. हे महर्षी दुर्वासांची सिद्ध तपस्या स्थळ आहे आणि तिन्ही युगांत प्रसिद्ध आहे. भारताच्या समस्त भागातून लोक या आश्रमाच्या दर्शनासाठी आणि आपल्या विविध भौतिक मनोकामनांची पूर्ती करण्यासाठी येतात.

महर्षी अत्री, सृष्टिकर्ता (विश्वाचे सृजन करणाऱ्या) ब्रह्मदेवांचे मानस–पुत्र होते. त्यांना प्रलयकर्ता ब्रह्मदेव, विष्णू, महेश—हे त्रिदेव

(तीन देव) वर देण्यास उपस्थित झाले. या तिघांचे दर्शन करून अत्री कृतकृत्य झाले. ते प्रेमाने ओतप्रोत होऊन त्यांची स्तुती करू लागले. या तिन्ही देवांनी प्रसन्न होऊन त्यांना वर मागण्यास सांगितले. अत्रींनी पत्नी अनुसूयेंशी परामर्श (सल्लामसलत, विचारविमर्श) करून हा वर मागितला की आपण तिघेही आमचे पुत्र होवोत. 'असेच होवो'—असे म्हणून त्यांनी आपापल्या धामात प्रस्थान केले.

थोड्याच दिवसांत देवर्षी नारद वीणेवर भगवंताचे गुणगान करत लक्ष्मी, सरस्वती आणि उमांना (पार्वतींना) भेटले. त्यांनीं प्रसंगवशतः अनुसूयेंच्या पातिव्रत्य धर्माची खूपच स्तुती केली. त्यांनी सांगितले की या वेळेस अत्रींची पत्नी अनुसूया विश्वभरात (जगभर) आपल्या पातिव्रत्य धर्मासाठी सर्वात प्रसिद्ध नारी आहे. तिच्यापेक्षा श्रेष्ठ या त्रिलोकात (तिन्ही लोकांत) कोणतीही पतिव्रता स्त्री नाही आहे.

देवर्षींची ही गोष्ट ऐकून त्या तिन्ही देवींचा चेहरा काहीसा उतरला. त्यांना हा अभिमान होता की या त्रिलोकात त्यांच्यापेक्षा श्रेष्ठ कोणीही पतिव्रता स्त्री नाही आहे. त्या या गोष्टीला सहन करू शकल्या नाहीत. त्यांनी आपापल्या पतींकडे—श्रीविष्णू, श्रीब्रह्मदेव आणि श्री महेशांजवळ वैयक्तिकरीत्या आग्रह केला की आपण अनुसूयेंच्या पातिव्रत्य धर्माची कठीण परीक्षा घ्यावी, जेणेकरून त्या या कठीण परीक्षेत उत्तीर्ण होऊ शकणार नाहीत. परंतु, तिन्ही देवांनी आपापल्या पत्नींना हे समजावले की अनुसूया परम तपस्विनी, पतिव्रता आणि परम भगवद्भक्त आहेत. असे केल्याने लाभ न होता हानीच होईल. तरीपण त्या तिन्ही देव्या (देवीगण) पुनःपुन्हा अनसूयेंची परीक्षा घेण्यासाठी हट्ट करू लागल्या.

आपापल्या पत्न्यांद्वारे (बायकांद्वारे) पुनःपुन्हा खूपच आग्रह केल्या गेल्यावर ब्रह्मदेव, विष्णू आणि महेश—हे तिघेही श्रीअत्री आणि अनुसूयेंच्या चित्रकुट–स्थित आश्रमात उपस्थित झाले. त्यावेळी तपस्विनी अनुसूया आश्रमात एकट्याच होत्या. जवळच अत्री एका

पर्वताच्या गुहेत भगवंतांच्या आराधनेत मग्न होते. घनघोर जंगलात पर्वत श्रेणींमध्ये स्थित अनुसूयेंच्या आश्रमात या तिघांनी प्रवेश केला. त्यांना पाहून अनसूया उठून उभ्या राहिल्या आणि हात जोडून, त्यांना प्रणाम करून, त्यांनी विचारले की आपण अतिथींची (पाहुण्यांची, अभ्यागतांची) मी काय सेवा करू? आपण (सर्व) लोक आमचे पूज्य अतिथी आहात. असे म्हणून त्यांच्या सेवेसाठी हातामध्ये पाणी आणि काही फळे व फुले घेऊन त्यांच्यासमोर उपस्थित झाल्या. परंतु, ते तिघेही साधारण अतिथी नव्हते. ते म्हणाले—"जर आपण पूर्णतः निर्वस्त्र होऊन आम्हाला भिक्षा दिली, तरच आम्ही तिला स्वीकार करू, अन्यथा आम्ही तिघेही अतृप्त होऊन निघून जाऊ."

त्यांची अशी ही विचित्र इच्छा ऐकून अनुसूयेंनी काही विचार केला आणि त्यांना काही काळ तेथेच प्रतीक्षा करण्यास सांगून त्या आपले पती अत्री ऋषींजवळ आल्या आणि तिन्ही अतिथींची अत्यंत अद्भुत भिक्षा ग्रहण करण्याची गोष्ट सांगितली. अत्री ऋषींनी ध्यान धरले आणि पाहिले की तिन्ही अतिथी इतर कोणी नसून स्वतः ब्रह्मदेव, विष्णू आणि महेश आहेत. त्यांनी आपल्या पत्नींना निर्देश दिला की हे तिन्ही अतिथी कोणी साधारण अतिथी नाही आहेत, स्वतः ब्रह्मदेव, विष्णू आणि महेश आहेत. तुम्ही त्रिदेवांच्या इच्छेनुसार त्यांचा सत्कार करावा, त्यामुळे काहीच हानी होणार नाही. त्या तेथून आश्रमात परतल्या आणि त्रिदेवांना म्हणाल्या की मी आपण अतिथींच्या इच्छेप्रमाणे सेवा करण्यास सहमत आहे, परंतु आपणपण माझ्या इच्छेनुसार नवजात शिशू बनून माझ्या मांडीवर बसा. लगेचच ते तिघेही बालके बनून त्यांच्या मांडीवर खेळू लागले. अनुसूया तिन्ही बालकांचे मोठ्या प्रेमाने पालन–पोषण करू लागल्या. त्या तीन बालकांचे नामकरण पण केले गेले—चंद्र, दत्तात्रेय आणि दुर्वासा. ब्रह्मदेव चंद्राच्या रूपात, विष्णू दत्तात्रेयांच्या रूपात, महेश दुर्वासांच्या रूपात अवतरित झाले.

काही दिवसानंतर लक्ष्मी, सरस्वती आणि उमा—या तिन्ही

देव्या (देवीगण) आपले पती परत न आल्याने फार चिंतित झाल्या. त्यांना देवर्षी नारदांकडून पत्ता लागला की त्या तिघींचे नवरे बाळे बनून अनुसूयेंच्या मांडीवर खेळत आहेत; हे जाणून त्या तिघी एकाच वेळी साधारण वेषात अनुसूयेंच्या आश्रमात उपस्थित झाल्या. अनुसूयेंनी त्यांचा आदरसत्कार केल्यानंतर विचारले की आपण कोण आहात? त्यांनी उत्तर दिले की आम्ही तिघीजणी आपल्या सुना आहोत. अनुसूयेंनी विचारले—"आपण माझ्या सुना कशा काय झालात?" तर त्यांनी थोडे लाजून उत्तर दिले—"तुमच्या मांडीवर हे तिन्ही बालके दुसरे कोणी नसून आमचे पती आहेत. आमचे पती आपली मुले आहेत, म्हणून आम्ही आपल्या सुना झालोत." अनुसूयेंनी त्यांना हसत विचारले की आपण काय इच्छिता? देवींनी उत्तर दिले. "आम्ही आपापल्या पतींना पुन्हा प्राप्त करू इच्छितो. आपण कृपा करून यांना यांच्या पूर्व रूपात आम्हाला वापस करा." हे ऐकून अनुसूया म्हणाल्या की या वर्तमान स्वरूपात हे माझ्या पुत्रांच्या रूपात माझ्याजवळच राहतील, सोबतच हे आपल्या पूर्व स्वरूपात आपल्या तिघींसोबत आपापल्या धामांमध्ये पण विराजमान असतील." ही कथा सत्ययुगाच्या प्रारंभी घडली. पुराणांमध्ये आणि महाभारतात याचे सविस्तर वर्णन आहे.

## सत्ययुगामध्ये महर्षी दुर्वासा

दुर्वासा थोडे मोठे झाले. आईवडिलांची आज्ञा घेऊन अन्न-पाण्याचा त्याग करून ते कठोर तपस्या करू लागले. विशेषतः यम, नियम, आसन, प्राणायाम, ध्यान, धारणा इत्यादी अष्टांग योगाचे अवलंबन करून ते अशा सिद्ध अवस्थेला पोहोचले की त्यांना अनेक सिद्धी प्राप्त झाल्या. आता ते सिद्ध योगीच्या रूपात जगात विख्यात झाले. ते जे काही म्हणत, तसेच होत असे. त्यांचे हजारो शिष्य झाले.

त्यानंतर यमुनेच्या किनाऱ्यावर याच स्थळावर त्यांनी एक सुंदर आश्रम बनविला आणि येथेच राहून आवश्यकतेनुसार

अधूनमधून ते इच्छेने सर्वत्र भ्रमणसुद्धा करीत असत. मोठमोठे ऋषि–महर्षिगण त्यांना भेटावयास येथे येत असत. आश्रमपण यमुनेच्या किनाऱ्यावर सुंदर उपवनात खूपच मनोहर होता, त्यात कोकीळ कुहुकुहू गात असत, मयूर नृत्य करीत असत, हरिण आणि हरिणी इकडून तिकडे उड्या मारत असत. वेगवेगळे प्राणी स्वच्छंदरूपाने तिथे विहार करीत असत. जवळच कमळांच्या फुलांनी भरलेली यमुना–नदी कल–कल ध्वनी करीत प्रवाहित होत होती. अशाप्रकारे त्यांचा आश्रम खूपच सुंदर आणि मनोरम वाटायचा.

दुर्वासा आश्रमाजवळच यमुनेच्या पलीकडे दुसऱ्या किनाऱ्यावर महाराज अंबरीष यांचा एक फारच सुंदर राजवाडा होता. महाराज अंबरीष आपल्या अतिशय दूर असलेल्या राजधानीतून येऊन येथे निवास करून साधन–भजन करीत असत. एकेकाळची गोष्ट आहे. ते निर्जल उपवास करीत होते आणि रात्री जागरण करून द्वादशी–व्रत पालन करीत होते. दुसऱ्या दिवशी पहाटे आपली नित्य क्रिया, स्नान, आन्हिक, आणि अर्चन–पूजा उरकून उपस्थित वैष्णव, ब्राह्मण आणि अतिथींचा सत्कार करून आणि त्यांना भगवंतांच्या प्रसादाद्वारे प्रसन्न करून स्वतः महाद्वादशीचे पारणे करू इच्छित होते. सूर्योदयानंतर दोन घटिकांच्या आतच पारणाची वेळ होती. वेळ फारच कमी होता, एवढ्यात महर्षी दुर्वासा तेथे येऊन पोहोचले. महर्षींना पाहून महाराज अंबरीष फारच प्रसन्न झाले. ते म्हणाले —“हे महर्षे! आज आमचे परम सौभाग्य आहे की आपल्या सारख्या अतिथीची सेवा करण्याचा सुयोग प्राप्त झाला आहे. देवाचा महाप्रसाद आपल्यासमोर प्रस्तुत आहे, कृपया आपण स्वीकारा.” दुर्वासा फार विचित्र (अवघड स्वभावाचे) ऋषी होते, त्यांचा स्वभाव निराळा होता. ते कधी काय करतील, हे समजणे फारच कठीण होते. त्यांनी सांगितले की मी अजून स्नान आणि इतर नित्य–क्रिया समाप्त केल्या नाहीत. मी यमुनेत स्नान आदी करून लगेचच वापस येतो. असे म्हणून लगेचच ते यमुनेच्या तटाकडे गेले.

पारणाचा समय निघून जात होता. ऋषींनी यायला वेळ

लावला, अजूनपण आले नाहीत. महाराज अंबरीष उभय (दुहेरी) संकटात पडले. जर निमंत्रित अतिथींना जेवू न घालता पारणे केले तर ब्राम्हण अतिथीची अवज्ञा होईल आणि ऋषी असंतुष्ट होऊन अभिशाप देण्याची शक्यता होती. अशाप्रकारे लौकिक सदाचाराचे उल्लंघन होईल. परंतु, दुसरीकडे द्वादशीला उचित वेळेवर पारणे न केल्याने पारमार्थिक भक्तीची हानी होईल. त्यांनी धर्मज्ञ ब्राह्मणांचा सल्ला घेऊन निर्दिष्ट वेळेच्या आतच एक थेंब श्रीचरणामृत घेतले, कारण जे लोक व्रताच्या दिवशी निर्जल उपवास करतात, त्यांच्याकरिता दुसऱ्या दिवशी चरणामृत आदी पाण्याद्वारे पारणाचा नियम शास्त्रात सांगितला आहे. पण जे लोक व्रताच्या दिवशी अनुकल्प म्हणून फळे वगैरे ग्रहण करतात, त्यांच्यासाठी भगवंतांचा अन्न–प्रसाद घेऊन पारणे करण्याचा शास्त्रात विधी आहे. कोणत्याही प्रकारे पारमार्थिक भक्तीचा अनादर होवू नये, अन्यथा भक्ती नष्ट होते. अशाप्रकारे अंबरीष महाराजांनी परमार्थाची महत्ता श्रेष्ठ समजून चरणामृतानेच पारणे केले. या प्रकारे त्यांचे द्वादशी व्रताचे पारणे झाले आणि नाही पण झाले. लौकिक धर्माला सोडून परमार्थाचे रक्षण करणेच उचित आहे.

ते पारणे करणारच होते की ऋषी तेथे उपस्थित झाले. त्यांनी योगबळाने हे ओळखले की अंबरीष महाराजांनी द्वादशीचे पारणे केले आहे. ते रागाने थरथर कापू लागले. ते म्हणाले की तुम्ही खूपच पाखंडी (ढोंगी किंवा लबाड) आहात, तुम्ही मला निमंत्रण देवून भोजनाला बोलावले आणि मला खायला द्यायच्या आधीच स्वतःच भोजन केले. मी तुम्हाला आताच याचा शिक्षा देतो. असे म्हणून त्यांनी आपल्या जटेचा काही अंश उपटून जमिनीवर आदळला. त्या जटेतून एक जळत असलेली कृत्या राक्षसी प्रकट झाली आणि अंबरीष महाराजांना जाळण्यासाठी अतिशय वेगाने अग्रेसर झाली. अंबरीष महाराज हात जोडून उभे होते, परंतु ते संपूर्णपणे निर्भय होते, कारण ते अनन्यरूपाने भगवंतांना शरणागत होते. ठीक याच वेळी शरणागत वत्सल

भगवंतांचे महाबलशाली सुदर्शन चक्र भक्ताच्या रक्षणाकरिता क्षणभरात प्रकट झाले. त्यांनी कृत्या राक्षसीला जाळून भस्म केले आणि ते दुर्वासा मुनींकडे अग्रेसर झाले. दुर्वासा मुनी खूपच भयभीत झाले, ते आपल्या प्राणांचे रक्षण करण्याकरिता खूप वेगाने पळत होते. ते तिथून पाताळ आणि स्वर्ग आदी चौदा लोकांना पार करून शिवलोकात पोहोचले आणि शंकरांपाशी आपले रक्षण करण्यासाठी प्रार्थना करू लागले. सुदर्शन चक्र फार वेगाने त्यांचा पाठलाग करत होते. त्यांना बघताच शंकर त्यांना म्हणाले, तुम्ही खूपच विचित्र (अवघड) आहात. भगवंतांच्या भक्तांसोबत पण भांडता, तुम्ही त्यांचा महिमा जाणत नाही. भगवद्भक्तांच्या चरणी अपराध करणाऱ्याला मी कोणतेही सहाय्य करू शकत नाही. तुम्ही सरळ त्या भगवान विष्णूंकडे जा, ज्यांचे हे चक्र आहे, तेच तुमचे रक्षण करू शकतील, इतर कोणीही नाही.

ते आल्या पावली विष्णुलोकात भगवान विष्णूंच्या श्रीचरणी उपस्थित झाले आणि आपल्या प्राणाचे रक्षण करण्याची प्रार्थना करू लागले—“प्रभो! माझे रक्षण करा, मी खूपच आर्त आहे. आपल्या व्यतिरिक्त कोणीही या जगात माझे रक्षण करू शकणार नाही. म्हणून मी आपल्याला शरण आलो आहे. आपण शरणागत-वत्सल आहात, म्हणून शरणागतांचे रक्षण करणे हाच आपला स्वभाव आहे.” भगवान विष्णू म्हणाले—“मी भक्तांचा विद्वेष करणाऱ्यांचे रक्षण करू शकत नाही. मी भक्तांचे हृदय आहे आणि भक्त माझे हृदय आहेत. मी भक्तांना कधीच सोडू शकत नाही, मी त्यांच्या अधीन आहे. माझ्या ज्या भक्ताच्या चरणी आपण अपराध केला आहात, तो भक्तच आपल्याला क्षमा करू शकतो, मी करू शकत नाही. म्हणून जर आपण आपले कल्याण इच्छिता, तर भक्त अंबरीषांच्या निकटच क्षमा याचना करावी.”

असे ऐकून दुर्वासा मुनी खूप निराश झाले. दुसरा कोणताही उपाय न पाहून, त्यांनी अंबरीष महाराजांकडे जाण्याचाच निश्चय केला. जसे ते अंबरीष महाराजांकडे आले, अंबरीष महाराजांनी

त्यांना मोठ्या नम्रतेने हात जोडून नमस्कार केला. पण दुर्वासा मुनींनी त्यांच्या चरणावर लोटांगण घातले आणि आपल्या कुकृत्याबद्दल त्यांच्यापाशी क्षमा प्रार्थना मागत आपल्या प्राणांच्या रक्षणाची प्रार्थना करू लागले. महाराज अंबरीषांनी सुदर्शन चक्राची स्तुती करून त्याला शांत केले. दुर्वासा मुनी भक्तीचा असा महिमा पाहून स्तब्ध झाले आणि म्हणाले, "धन्य आहे! आज मी भगवान अनंतदेवांच्या भक्तांचे महत्त्व पाहिले; राजन! मी आपल्याप्रती अपराध केला, तरीसुद्धा आपण माझ्याबद्दल मंगल कामनाच करीत आहात. ज्यांनी भक्तवत्सल श्रीहरीची चरणकमळे दृढ प्रेमाने धरली आहेत, त्या साधूपुरुषांना कोणते कार्य अशक्य आहे? ज्यांचे हृदय इतके उदार आहे, असे महात्मा भले कोणत्या वस्तूचा त्याग करू शकणार नाहीत, ज्यांच्या मंगलमय वाणीच्या श्रवणानेच जिवांचे हृदय मंगल होते, अशा तीर्थपाद श्रीभगवंतांच्या दासांचे कोणते कर्तव्य अपूर्ण राहाते अर्थात काहीही अपूर्ण राहात नाही. अहो! आपण माझ्यावरती महान अनुग्रह केला आहे. आपण माझ्या अपराधांना विसरून माझ्या प्राणांचे रक्षण केले आहे."

जेव्हापासून दुर्वासा मुनी आपल्या प्राणांचे रक्षण करण्याकरता इकडे–तिकडे पळत होते, तेव्हापासून आतापर्यंत महाराज अंबरीषांनी भोजन केले नव्हते. त्यांच्या येण्याची ते वाट पहात होते. त्यांनी दुर्वासा मुनींचे चरण पकडले आणि त्यांना खूप प्रेमाने जेवू घातले. दुर्वासा मुनी जेवण करून तृप्त झाले आणि मोठ्या आदराने त्यांना म्हणाले, "राजन! तुम्हीपण जेवण करून घ्या."

दुर्वासांनी संतुष्ट होऊन अंबरीष महाराजांच्या गुणांची स्तुती केली आणि आपल्या आश्रमाला परतले. अंबरीष महाराजांच्या सहवासाने दुर्वासा महर्षींचे जीवन चरित्र बदलले (पालटले). आता ते ब्रह्मज्ञान, अष्टांग–योग इत्यादी पेक्षा शुद्ध भक्तीच्या महिमेची अधिकता समजून भक्तिमार्गाकडे वळले.

# त्रेतायुगामध्ये महर्षी दुर्वासा

उक्त (आधी सांगितलेल्या) घटनेनंतर दुर्वासा वृंदावनात असलेल्या त्यांच्या या आश्रमामध्ये अधिक निवास करू लागले. तेथून ते आवश्यकतेनुसार विश्व आणि अन्य लोकात भ्रमण करूं लागले. त्रेतायुगामध्ये पण महर्षी दुर्वासांच्या अनेक कथांचा उल्लेख विविध पुराणांमध्ये आणि महाभारतात आढळतो.

श्रीरामचंद्रांनी या धरतीवर अवतीर्ण होऊन अकरा हजार वर्ष पर्यंत लीला केल्या. शेवटी ब्रह्मदेवांच्या इच्छेनुसार कालपुरुष एका महर्षींचे रूप धारण करून श्रीरामचंद्रांजवळ आले. त्यांनी श्रीरामचंद्रांबरोबर एकांत स्थानात काही संभाषण करण्याची इच्छा प्रकट केली, जेणेकरून कोणतीही व्यक्ती ते (संभाषण) ऐकू शकणार नाही. भगवान श्रीरामचंद्रांनी लक्ष्मणांकडे वळून त्यांना सांगितले—"लक्ष्मण! तुम्ही स्वयं राजभवनाच्या द्वारात उभा रहा आणि कोणालाही आत येऊ देऊ नका. जर कोणी व्यक्ती आम्हा दोघांच्या वार्तालापाच्या मध्ये उपस्थित झाली, तर तिला मी मृत्युदंड देईन." लक्ष्मण राजभवनाच्या द्वारात उभे राहीले. इकडे कालपुरुष आणि श्रीरामचंद्रांमध्ये वार्तालाप होऊ लागला. कालपुरुषांनी श्रीब्रह्मदेवांचा संदेश ऐकवला की आता आपल्या लीलेची वेळ संपली आहे, म्हणून आपल्याला आपल्या लीलेचे तिरोधान करून (आपल्या लीलेवर पडदा टाकून) नित्य-धामात प्रवेश करावयास हवा. वार्तालाप होतच होता, तेवढ्यात दुर्वासा महर्षी राजभवनाच्या द्वारात आले आणि लक्ष्मणांना म्हणाले की मी अत्यावश्यक कार्यासाठी आताच श्रीरामचंद्रांना भेटू इच्छितो. श्रीलक्ष्मण म्हणाले —"महात्मा! आपण आपले कार्य सांगा, मी त्याला शीघ्र पूर्ण करेन." पण क्रोधी स्वभावाच्या दुर्वासा मुनींनी ऐकले नाही. ते म्हणाले—"मला आताच श्रीरामचंद्रांना भेटायचे आहे; तु जर मला त्यांना भेटू दिले नाही, तर मी राजा रामचंद्र आणि राज्यातील सर्व प्रजेला शाप देवून भस्म करेन." लक्ष्मणांनी मनात विचार केला की

संपूर्ण प्रजेसोबत श्रीरामचंद्र आणि स्वतःला भस्म करविण्यापेक्षा माझ्या एकट्याचे भस्म होणेच उचित आहे. असा विचार करून ते एकटे श्रीरामचंद्रांकडे आले.

तोपर्यंत कालपुरुषांबरोबर श्रीरामचंद्रांचा वार्तालाप (चर्चा) समाप्त झाला होता. परंतु कालपुरुष अजूनही उपस्थित होता. श्रीरामचंद्रांनी विचारले—"लक्ष्मण! तुम्ही अयोग्य वेळी का आलात?" श्रीलक्ष्मण म्हणाले—"प्रभो! द्वारात दुर्वास महर्षी आलेले आहेत. ते फक्त आपल्यालाच आणि अगदी लगेचच भेटू इच्छितात. विलंब झाल्यास साऱ्या प्रजेसोबत आपल्याला आणि मलापण शापाने भस्म करण्यास तयार आहे." श्रीरामचंद्रांनी कालपुरुषांना निरोप दिला आणि खूप उदास होवून ते गंभीर स्वरात लक्ष्मणांना म्हणाले—"काय तुम्हण माझ्या प्रतिज्ञेची आठवण आहे? वार्तालापाच्या मध्ये (चर्चेदरम्यान) अयोग्य वेळी आलेल्या कोणत्याही व्यक्तीला मी प्राणदंड देण्याची प्रतिज्ञा केली आहे. प्रिय व्यक्तीचा त्याग करणेच सत्पुरुषांसाठी प्राणदंडाची शिक्षा देण्यासारखे आहे. म्हणून जीवनभरासाठी मी तुमचा त्याग करतो."

लक्ष्मण श्रीरामचंद्रांच्या श्रीचरणीं प्रणाम करून राजभवनातून निघून सरळ शरयू नदीच्या तटावर आले. तेथे ते शरयू नदीमध्ये स्नान करून आपल्या चित्ताला एकाग्र करून ध्यानस्थ झाले आणि आपल्या धामाला पोहोचले.

इकडे रामचंद्रांनी दुर्वासा मुनींना बोलावले. दुर्वासा आल्यावर त्यांचा खूपच आदर-सत्कार करून विचारले—"महर्षी! मी आपली काय सेवा करू शकतो?" दुर्वासा मुनी म्हणाले—"मला खूप भूक लागली आहे. आपल्या घरात जी काही सामग्री प्रस्तुत (तयार, विद्यमान) आहे, ती मला त्वरित खायला द्या." श्रीरामचंद्रांनी घरात जी काही खाद्य-सामग्री उपलब्ध होती, ती ऋषींच्या समोर ठेवली. ऋषींनी ती सर्व सुस्वादू खाद्यसामग्री पोट भरून खाल्ली आणि संतुष्ट होवून ते तेथून निघून गेले.

रामचंद्र लक्ष्मणांच्या वियोगात खूप दुःखी झाले. त्यांनी

लक्ष्मणांच्या स्वधाम जाण्याचा वृत्तांत ऐकून स्वतःही स्वधामाला जाण्याचा विचार केला. आपल्या दोन्ही पुत्रांचा—लव, कुश आणि आपल्या भावांच्या पुत्रांचा वेगवेगळया राज्यांवर अभिषेक करून अयोध्येच्या साऱ्या प्रजेला बरोबर घेऊन शरयू नदीच्या पवित्र तटावर उपस्थित झाले. तेथे त्यांनी सर्वांसोबत अंघोळ केली. एवढ्यात आकाशातून सूर्यासमान चमकणारी लाखो विमाने तिथे उपस्थित झाली. श्रीरामचंद्र उपस्थित जनसमूहासोबत त्या विमानांवर चढून स्वधामाला गेले.

लक्ष्मणांचा त्याग एक बहाणा (निमित्त, बतावणी, ढोंग) मात्र होता. श्रीरामचंद्र लक्ष्मणांचा त्याग कधीच करू शकत नाहीत, कारण लक्ष्मण धामस्वरूप आहेत. ते श्रीकृष्णांच्या प्रत्येक अवतारात त्यांच्या बरोबरच राहातात आणि त्यांच्या सर्व प्रकारच्या लीलेत सहाय्यक होतात. अशा प्रकारे लक्ष्मण नित्य साकेत धामात श्रीरामांच्या पूर्वीच उपस्थित होवून त्यांची वाट पहात होते. श्रीरामचंद्रांचे स्वधामात आगमन होताच त्यांनी त्यांचे स्वागत केले.

* * *

प्राचीन काळी इंद्रांच्या समान बळ आणि पराक्रमाने संपन्न (युक्त) श्वेतकी नावाचे एक राजा होते. त्यावेळी त्यांच्यासारखे यज्ञ करणारा, दाता आणि बुद्धिमान दुसरा कोणी नव्हता. त्यांनी प्रचुर दक्षिणेच्या अनेक मोठमोठया यज्ञांचे अनुष्ठान केले होते. यज्ञ आणि दान सोडून त्यांच्या मनामध्ये दुसरा कोणताही विचार येत नसे. ते नवनवीन यज्ञांच्या अनुष्ठान आणि नाना प्रकाराच्या दानकार्यांमध्ये लागलेले होते. यज्ञ करता-करता ऋत्विजांचे (यज्ञात आहुती देणाऱ्या व्यक्तींचे) डोळे धुराने व्याकूळ झाले, आहुती देता-देता ते थकले. त्यांची अनुमती घेवून राजांनी नवीन-नवीन ऋत्विजांना नियुक्त केले, पण ते सुद्धा थकले. राजांच्या द्वारे शोधून सुद्धा यज्ञ करणारे ऋत्विज भेटेनासे झाले. शेवटी ते ऋत्विजांना शरण गेले. त्यांनी परामर्ष (सल्ला) दिला की आपण महादेव श्रीरुद्रांजवळ जा, तेच याची काही व्यवस्था करू शकतील. महाराज श्वेतकी कैलास

पर्वतावर जाऊन श्रीरुद्रदेवांना प्रसन्न करण्यासाठी काहीही न खातापिता उग्र तपस्या (तपश्चर्या) करू लागले. त्यांची घोर तपस्या पाहून शंकरांनी प्रसन्न होऊन त्यांना दर्शन दिले आणि वर मागण्यास सांगितले. महाराज श्वेतकी अमित (अपरिमित) तेजस्वी श्रीरुद्रांच्या चरणी नतमस्तक होवून म्हणाले—"देव देवेश! सुरेश्वर! मी एक शतवर्षीय (शंभर वर्षे चालणारा) मोठा यज्ञ आरंभ करू इच्छितो, जर तुम्ही माझ्यावर प्रसन्न असाल, तर आपण स्वतः येऊन माझा यज्ञ संपन्न करा." शंकर हसून म्हणाले— "यज्ञ करणे हे आमचे काम नाही. मी स्वतः तुमचा यज्ञ करणार नाही, परंतु माझ्याच अंशातून उत्पन्न झालेले एक महाभाग श्रेष्ठ द्विज आहेत, जे दुर्वासा नावाने विख्यात आहे, तेच तुमचा यज्ञ करतील. रुद्रदेवांनी महर्षी दुर्वासांना बोलावून राजा श्वेतकींचा यज्ञ पूर्ण करण्याची आज्ञा दिली. महर्षी दुर्वासांनी रुद्रदेवांची आज्ञा शिरोधार्य मानून विधि–विधानपूर्वक राजांचा यज्ञ केला. महाराज श्वेतकींची इच्छा पूर्ण झाली आणि त्यांनी ऋत्विजांना प्रचुर धन दक्षिणा देवून संतुष्ट केले.

* * *

महर्षी दुर्वासा खूपच तेजस्वी होते. त्यांची सर्वत्रच मोठी ख्याती पसरली. एकदा महाराज उर्व आपली विवाह योग्य कन्या कंदलीसाठी योग्य वर शोधत होते. कंदली खूपच रूप आणि यौवन–संपन्ना किशोरी होती, पण फारच कटुभाषी (वाईट किंवा कडू बोलणारी) आणि भांडखोर (भांडकुदळ) होती आणि छोट्या–छोट्या गोष्टींवरून राग करायची. तिचे वडील तिचा विवाह कोण्या योग्य वराशी करू इच्छित होते. ते आपली कन्या कंदलीला घेवून दुर्वासा महर्षींच्या आश्रमात आले. त्यांनी मोठ्या नम्रतापूर्वक दुर्वासा मुनींना प्रणाम केला आणि आपल्या कन्येला पत्नी म्हणून स्वीकार स्वीकारण्याची विनंती केली. ऋषींनी रूप–यौवनाने संपन्न कंदलीला पाहून आपली संमती दिली. जेंव्हा विवाह होण्याची वेळ आली, तेंव्हा महाराजांनी महर्षींपुढे ही प्रार्थना केली की आपण कृपा करून

हिचे अपराध क्षमा करावे. शेवटी हिचे शंभर अपराध अवश्यच (नक्कीच) क्षमा करावे. दुर्वासा मुनींनी हे स्वीकार केले. विवाह झाल्यावर कंदली दुर्वासांच्या आश्रमात आली. येथे आल्यावर दुर्वासांना हे माहीत पडले की ही कलहप्रिय (कुरापत काढणारी किंवा भांडण प्रिय असणारी) आहे, प्रत्येक वेळी अपमानजनक व्यवहार करते. खूप समजल्यावर सुद्धा तिचा स्वभाव बदलला नाही. थोड्याच दिवसात तिने दुर्वासांप्रती शंभरहून अधिक वेळा अपमानजनक व्यवहार केला, तेव्हां महर्षींना राहवले नाही आणि त्यांनी शाप देऊन तिला भस्म करून टाकले.

थोड्या काळानंतर ते काही दिवसांकरिता द्वारकेमध्ये निवास करत होते. तेथे यदुवंशामध्ये उत्पन्न एक रूप-यौवन-संपन्ना एकानंशा नावाची कन्या होती. यादवांनी या कन्येचा विवाह महर्षी दुर्वासांशी करवून दिला. परंतु, थोड्याच दिवसात दुर्वासा महर्षींनी त्यातून विरक्त होवून उक्त एकानंशेंचा पण त्याग करून टाकला आणि पुनः आपल्या आश्रमात परतले.

* * *

कुरुक्षेत्रामध्ये मुद्गल नावाचे एक ऋषी होते. ते फारच धर्मात्मा आणि जितेंद्रिय होते. शेतीमधील पीक कापल्यानंतर जे अन्नाचे दाणे शेतात पडायचे, त्यांना एकत्रित करून (शिल आणि उंच्छवृत्तीने) आपली जीविका चालवत असत. ते सदा सत्य बोलायचे आणि कोणाचीही निंदा करीत नसत. त्यांनी अतिथींच्या सेवेचे व्रत घेतले होते. ते आपल्या स्त्री आणि पुत्राबरोबर पंधरा दिवसापर्यंत काही अन्न संग्रह करीत आणि त्याच्याद्वारे इष्टीकृत नामक यज्ञाचे अनुष्ठान करीत असत आणि अतिथींची सेवा करून उरलेल्या अन्नाने पंधरा दिवसात एकदाच भोजन करीत असत. जो पर्यंत ते जेवण करीत नसत, तो पर्यंत शेकडो अतिथींनी भोजन केल्यानंतर सुद्धा अन्न संपत नसे.

एकदा दुर्वासा ऋषी वेड्याप्रमाणे विचित्र वेष धारण करून, विवस्त्र होऊन नाना प्रकारचे कटू वचन बोलत महात्मा मुद्गलांच्या

आश्रमात आले आणि म्हणाले - “विप्रवर! मला खूप भूक लागली आहे, मी जेवण करू इच्छितो.” मुद्गल म्हणाले—“आपले स्वागत आहे.” असे बोलून त्यांनी पाद्य, अर्घ्य आणि आचमनीय आदी पूजन-सामग्री भेट केली आणि त्यांना भोजन अर्पण केले. दुर्वासा मुनींनी सर्व भोजन उदरस्थ केले आणि उष्टे घेऊन आपल्या साऱ्या शरीराला लेपले, आणि ते जसे आले होते तसेच निघूनही गेले. मुद्गल सपरिवार उपाशी राहिले.

पंधरा दिवसानंतर पुन्हा दुसरा पर्वकाळ आल्यावर दुर्वासामुनी परत तेथे पोहोचले आणि त्यांनी सर्व भोजन भक्षण करून टाकले. मुद्गल मुनी परत पुढच्या पर्वकाळाची तयारी करू लागले. पंधरा दिवसानंतर ठीक वेळेवर परत दुर्वासा मुनी तेथे पोहोचले आणि सारेच अन्न त्यांनी खाऊन टाकले. अशा प्रकारे लागोपाठ सहा वेळा ठीक पर्वाच्या समयी उपस्थित होवून सारे अन्न खावून टाकले. लागोपाठ इतके दिवस उपाशी राहून सुद्धा मुनींच्या मनात कोणताही विकार आला नाही. त्यांच्या हृदयामध्ये क्रोध, द्वेष, भीती आणि अपमानाचा स्पर्शपण झाला नाही. असे पाहून दुर्वासा महर्षी अत्यंत प्रसन्न होवून म्हणाले—“ब्रह्मन! (ब्राह्मण!) या संसारात इर्ष्या, द्वेष आणि अपमानरहित होऊन दान देणारा तुझ्यासारखा मनुष्य आणि दुसरा कोणीही नाही. अन्नानेच प्राणांचे रक्षण होते. भूक असल्याने मन चंचल होते, त्या वेळी मनाला थांबवणे खूपच कठीण आहे, पण तुम्ही सिद्ध झाला आहात. तुम्ही आपल्या कठोर तपस्येमूळे सर्व लोकांवर विजय प्राप्त केला आहे, म्हणून तुम्हाला स्वर्गालोकाची प्राप्ती होवो.” असे म्हणताच स्वर्गातून एक विमान खाली आले, परंतु स्वर्गलोकांच्या गुण आणि दोषांना नश्वर समजून मुद्गल मुनींनी त्या विमानाला परत पाठवून दिले.

* * *

## द्वापरमध्ये महर्षी दुर्वासा

यदुवंशी महाराज शुरसेनांचे पुत्र वसुदेव होते. त्यांना एक

कन्या पण होत्या, ज्यांचे नाव पृथा होते. भूमंडलामध्ये त्यांच्या रूपाच्या तुलनेत अधिक सुंदर दुसरी कोणी स्त्री नव्हती. शूरसेनांनी आपल्या संतानहीन आतेभाऊ कुंतिभोजांना त्या कन्या आपल्या पूर्व प्रतिज्ञेनुसार दिल्या. तेव्हांपासून त्यांचे एक नाव कुंतीपण झाले. त्यांनी कुंतीला दत्तक घेतले. पिता कुंतिभोजांनी पृथेवर घरी देवतांचे पूजन आणि अतिथींच्या सत्काराचा कार्यभार सोपवला. एकदा कठोर व्रताचे पालन करणारे आणि धर्माच्या विषयात आपल्या निश्चयाला सदा गुप्त ठेवणारे दुर्वासा राजा कुंतिभोजाच्या राजभवनामध्ये आले. पृथा खूप सावधानतेने त्यांची सेवा करू लागल्या. ऋषी खूप उग्र स्वभावाचे होते. त्यांचे हृदय फार कठोर होते, पण तरीसुद्धा राजकुमारी पृथांनी सर्व प्रकारच्या प्रयत्नांनी त्यांना पूर्ण संतुष्ट केले. दुर्वासा मुनींनी पृथांवर येणाऱ्या भावी संकटांचा विचार करून त्यांच्या धर्माच्या रक्षणार्थ अथर्ववेदीय प्रसिद्ध वशीकरण मंत्र प्रदान केला आणि त्याच्या प्रयोगाचा विधीपण सांगितला. त्यानंतर ते मुनी म्हणाले, "या मंत्राद्वारे तुम्ही ज्या देवतेला आवाहन कराल, त्यांच्या कृपेने तुम्हाला पुत्रप्राप्ती होईल." ब्रह्मर्षी दुर्वासांचे असे वक्तव्य ऐकून कुंतींच्या मनामध्ये मोठे कुतूहल उत्पन्न झाले. त्या राजकन्या सध्या कुमारी होत्या, परंतु त्यांनी मंत्रांच्या परीक्षेसाठी सूर्यदेवांना आवाहन केले. आवाहन करताच त्यांनी पाहिले की सूर्यदेव त्यांच्यापुढे येवून उभे राहिले. ही महान आश्चर्याची गोष्ट पाहून निर्दोष शरीराच्या कुंती चकित झाल्या. सूर्यदेवांनी विचारले. "सुंदर कुंती! मी तुमचे काय प्रिय कार्य करू? मी तुम्हाला पुत्र देण्याकरता येथे उपस्थित झालो आहे, तुम्ही मला सूर्यदेव समजा." कुंती लोकलज्जेच्या भयाने लाजल्या. त्या स्त्रीसुलभ लज्जेमुळे विवश झाल्या. सूर्यदेवांनी पुन्हा कुंतीना सांगितले, "राजकुमारी! तुम्हाला फारच मोठा शूरवीर, महादानी, स्वाभिमानी, दिव्य-कुंडले आणि कवच धारण करणारा एक सुंदर पुत्र होईल, येवढेच नाहीतर तुमचे कौमार्य पण अतूट राहील." असे म्हटल्यावर कुंतींपासून एक पुत्र उत्पन्न झाला. भविष्यात तोच पुत्र महावीर कर्णांच्या रूपात प्रसिद्ध

झाला. नंतर असेच आवाहन केल्यावर धर्मराज, पवनदेव आणि देवराज इंद्रांद्वारे पण क्रमशः युधिष्ठिर, भीम व अर्जुनांसारखे सुपुत्र प्राप्त झाले. हे दुर्वासा महर्षींच्याच कृपेचे फळ होते.

* * *

स्वयं भगवान श्रीकृष्णांचा आविर्भाव झाला होता. आता ते थोडे मोठे झाले होते. दाम, श्रीदाम, सुदाम, वसुदाम, स्तोककृष्ण, उज्ज्वल, लवंग, सुबल, मधुमंगल इत्यादी मित्रांसोबत गोकुळातील रमणरेतीवर खेळावयास लागले होते. कधी एक दुसऱ्यावर धूळ फेकत असत, तर कधी लपाछपी खेळत असत आणि कधी एकमेकांशी परस्पर कुस्तीत भिडून एकमेकांना पराजित करण्याचे प्रयत्न करीत असत. पराजित झालेला आपल्या खांद्यांवर पराजित करणाऱ्याला बसवून काही अंतरावर घेऊन जात असे. एवढ्यातच दुर्वासा फिरत–फिरत तिकडे आले. गोपबालकांच्या मनोहर क्रीडा पाहून, विशेषतः कृष्ण आणि बलरामांचे अनुपम सौंदर्य व माधुर्य पाहून ते एकटक त्यांच्याकडे बघू लागले. त्यांना आपल्याकडे एकटक पाहाताना बघून श्रीकृष्णांनी श्रीदामांचा हात पकडला आणि ऋषींजवळ गेले. ही दोन बालके धुळीने माखलेली होती. दुर्वासा मुनी स्थिर राहू शकले नाही. ते थरथरत खाली बसले. कृष्णांनी त्यांना हसतहसत विचारले, “बाबा! मी श्रीदामाला पराजित केले ना?” असे ते वारंवार विचारू लागले. परंतु, दुर्वासा काही उत्तर देऊ शकले नाहीत. ते स्तंभित आणि बिलकूल मौन झाले. कृष्णांनी परत विचारले—“बाबा, बोलत का नाही? मुकेतर नाहीत ना तुम्ही?” असे म्हणत ते त्यांच्या मांडीवर बसले आणि त्यांची दाढी पकडत म्हणाले, “बाबा! सांगा ना, मी जिंकलो आणि श्रीदाम पराजित झाला.” परंतु, ऋषी तरीही काहीच बोलू शकले नाहीत. त्यांना मौन पाहून श्रीकृष्ण त्यांच्या मांडीवर बसून हावभाव करीत हसू लागले. दुर्वासा त्यांच्या मुखात आपोआप बलपूर्वक ओढल्या गेले. तेथे त्यांनी कोटीकोटी ब्रह्मांडांना पाहिले, कोटीकोटी ब्रह्मदेव,

विष्णू आणि महेशपण पाहिले. ते कधी ह्या ब्रह्मांडात प्रवेश करीत होते, तर कधी त्या ब्रह्मांडात. अशाप्रकारे फिरत-फिरत जणू कोटीकोटी युग निघून गेले. सौभाग्यवश ते एका अशा ब्रह्मांडात पोहोचले जेथे श्रीकृष्णांची प्रकट लीला होत होती आणि त्या लीलेमध्ये पूर्ववत ते श्रीकृष्ण आणि संवगंड्यांपाशी आले. त्याचवेळी कृष्णांनी हसून तोंड उघडताच ते बाहेर आले. दुर्वासा मुनी कृष्णांचे असे अद्भुत चरित्र पाहून त्यांच्या चरणांवर पडले आणि स्तव-स्तुती करू लागले. कृष्णांच्या कृपेने त्यांचे जीवन कृतकृत्य झाले. कृष्ण केवळ नंदनंदन आहेत की परब्रह्म आहेत, ही त्यांची शंका दूर झाली. आता ते श्रीनंदनंदनांच परमपरात्पर ब्रह्म—स्वयं-भगवान समजून आणि कोटीकोटी वेळा दंडवत प्रणाम करून आपल्या आश्रमात परतले. श्रीकृष्ण पण भक्तावर कृपा करून गोपबालकांसोबत खेळत तेथून दुसरीकडे निघून गेले.

* * *

एके वेळी प्रसिद्ध दुर्वासा गोपराज वृषभानू महाराजांच्या राजभवनात आले. ते काही दिवस तेथेच राहिले. वृषभानू महाराजांनी आपली सर्वगुण-संपन्न लाडकी सुपुत्री कुमारी राधिकेंना त्यांच्या सेवा-सुश्रुशेच्या कार्यात नियुक्त केले. राजकुमारी राधिकेंची प्रीतिपूर्ण सेवा-शुश्रुशेने महर्षी खूपच खूश झाले आणि आशीर्वाद देत म्हणाले, “मुली, तु पाककलेत सिद्ध हस्त होशील, तुझ्या द्वारे प्रस्तुत केलेली प्रत्येक भोज्य-सामग्री अमृताहूनही सुस्वादू (स्वादिष्ट, लज्जतदार) होईल आणि बळ, आयुष्य, बुद्धी, सौंदर्य आणि आयुष्याचे वर्धन करेल. त्याचे सेवन करणारा व्यक्ती कुणाकडूनही पराजित होणार नाही, त्याच्या शरीराची कांती कधीच क्षीण होणार नाही.” असे म्हणून ते आपल्या आश्रमात परतले. व्रजामध्ये सर्वत्रच राधिकेंच्या पाक-कलेची निपुणता प्रसिद्ध झाली.

यशोदा मातेंनी पण व्रजवासींकडून विशेषतः पौर्णमासींकडून राधिकेंच्या पाक-कलेची सिद्धता आणि त्यांच्याद्वारे बनवलेल्या पक्वान्नांचा प्रभाव ऐकला होता. त्या कृष्णांना श्रीमती राधिकेंनी

